**राजकीय व सामाजिक आंदोलनातील खटले मागे घेण्यासाठी सरकारी वकील किंवा सहायक सरकारी वकील यांना सूचना/शिफारस करण्याकरिता मंत्रिमंडळ उपसमिती गठित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः पीआरओ-०५१६/प्र.क्र.१०६/विशा-२**

मंत्रालय, दुसरा मजला, मुख्य इमारत

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई.

दिनांक : २७ मार्च, २०२५.

वाचा :-

१) शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक: पीआरओ-०५१६/प्र.क्र.१०६/विशा-२, दिनांक ३० ऑगस्ट, २०१६.

२) शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक: पीआरओ-०११४/प्र.क्र.१२०/विशा-२, दिनांक १६ डिसेंबर, २०२०.

३) शासन शुद्धिपत्रक, गृह विभाग, क्रमांक: पीआरओ-११२०/प्र.क्र.३३८/विशा-२, दिनांक २८ डिसेंबर, २०२०.

४) शासन पत्र, गृह विभाग, क्रमांक: पीआरओ-०९२१/प्र.क्र.२८२/भाग-१/विशा-२, दिनांक ०६ एप्रिल, २०२३.

५) शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक: पीआरओ-०५१६/प्र.क्र.१०६/विशा-२, दिनांक ०८ जून, २०२३.

६) मा. मंत्रिमंडळाच्या दिनांक १७ मार्च,२०२५ रोजीच्या बैठकीचे कार्यवृत्त दिनांक २१ मार्च, २०२५.

प्रस्तावना :-

अनेक राजकीय पक्ष व सामाजिक संघटना यांच्याकडून सार्वजनिक हिताच्या व वेगवेगळ्या समस्यांकडे लक्ष वेधण्यासाठी आंदोलनाचे मार्ग अनुसरले जातात. त्यामुळे त्यांच्याविरुद्ध कायद्याचे उल्लंघन केल्याबद्दल गुन्हे दाखल होतात. राजकीय व सामाजिक आंदोलनामुळे उद्भवलेल्या गुन्ह्यांमध्ये दोषारोपपत्र दाखल झालेले खटले मागे घेण्याबाबत शासनाने यापूर्वी उपरोक्त नमूद शासन निर्णयान्वये वेळोवेळी धोरणात्मक निर्णय घेतले आहेत.

राजकीय व सामाजिक आंदोलनामुळे दाखल झालेले खटले मागे घेण्याबाबत अनेक लोकप्रतिनिधीकडून शासनास मोठ्या प्रमाणावर विनंत्या प्राप्त होत असतात. अशा प्रकारच्या खटल्यांच्या बाबतीत शासनाने निश्चित निर्णय घेणे आवश्यक ठरते. त्याकरिता खटले मागे घेण्यासाठी संबंधित सरकारी वकील किंवा सहायक सरकारी वकील यांना योग्य मार्फतीने सूचना/शिफारस करण्यासाठी शासन स्तरावर वाचा क्र.५ येथील दि.०८ जून, २०२३ च्या शासन निर्णयान्वये मंत्रिमंडळ उपसमिती गठित करण्यात आली होती. राज्यात दिनांक २०/११/२०२४ रोजी झालेल्या विधानसभा सार्वत्रिक निवडणूक-२०२४ च्या निकालांच्या आधारे राज्यात नवीन मंत्रिमंडळ स्थापन झाले आहे. त्यानुसार उक्त दि.०८ जून, २०२३ रोजीचा शासन निर्णय अधिक्रमित करुन, नवीन मंत्रिमंडळ उपसमिती गठित करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते. त्यानुसार पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे :-

**शासन निर्णय:-**

राजकीय व सामाजिक आंदोलनातील खटले मागे घेण्याबाबत भारतीय नागरिक सुरक्षा संहिता, २०२३ मधील कलम ३६० मधील तरतूदीस अनुसरुन ( फौजदारी प्रक्रिया संहिता, १९७३ मधील कलम ३२१) संबंधित सरकारी वकील अथवा सहायक सरकारी वकील यांना योग्य मार्फतीने सूचना/शिफारस करण्यासाठी मा. मंत्रिमंडळाच्या दिनांक १७.०३.२०२५ रोजीच्या बैठकीत प्राप्त मान्यतेनुसार शासन स्तरावर पुढीलप्रमाणे मंत्रिमंडळ उपसमिती गठित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | सदस्यांचे नाम/पदनाम | समितीमधील पद |
|---|---|---|
| १ | ॲड. आशिष शेलार, मंत्री, माहिती तंत्रज्ञान, सांस्कृतिक कार्य | अध्यक्ष |
| २ | श्री. उदय सामंत, मंत्री, उद्योग, मराठी भाषा | सदस्य |
| ३ | श्री. जयकुमार रावल, मंत्री, पणन, राजशिष्टाचार | सदस्य |
| ४ | श्री. शंभुराज देसाई, मंत्री, पर्यटन, खनिकर्म, माजी सैनिक कल्याण | सदस्य |
| ५ | श्री. दत्तात्रय भरणे, मंत्री, क्रिडा व युवक कल्याण, अल्पसंख्याक विकास व औकाफ | सदस्य |
| ६ | श्री. मकरंद पाटील, मंत्री, मदत व पुनर्वसन | सदस्य |
| ७ | प्रधान सचिव/सचिव, विधि व न्याय विभाग | सदस्य |
| ८ | प्रधान सचिव (विशेष),गृह विभाग | सदस्य सचिव |

२. उक्त उपसमिती ही दि.०१.०१.२०२४ पर्यंत दोषारोपपत्र दाखल झालेल्या खटल्यांबाबत निर्णय घेईल.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२७१७०६१९०८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

CHETAN BALASAHEB NIKAM

Digitally signed by CHETAN BALASAHEB NIKAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7268DE40660971F80951C66D0E657E903B378196F51A978D2A366CF5EB564C0C, cn=CHETAN BALASAHEB NIKAM
Date: 2025.03.27 17:09:03 +05'30'

**( चेतन निकम )**
**उप सचिव, गृह विभाग**

प्रत,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव.
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.उपमुख्यमंत्री (नगर विकास, गृहनिर्माण) यांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.राज्यमंत्री (गृह)(ग्रामीण), यांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा.राज्यमंत्री (गृह)(शहरे), यांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
८. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
९. मा. उप सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
१०. मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
११. मा. मंत्री(सर्व)/राज्यमंत्री(सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१२. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.

१३. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१४. अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. प्रधान सचिव (अपील व सुरक्षा), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७. प्रधान सचिव, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मंत्रालय, मुंबई.
१९. सचिव, माहिती व जनसंपर्क संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२०. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२१. अपर पोलीस महासंचालक,गुन्हे अन्वेषण विभाग,महाराष्ट्र राज्य,पुणे.
२२. सर्व विभागीय आयुक्त.
२३. सर्व जिल्हादंडाधिकारी.
२४. सर्व पोलीस आयुक्त (लोहमार्गासह).
२५. सर्व पोलीस अधीक्षक.
२६. सर्व जिल्हा अतिरिक्त पोलीस अधीक्षक.
२७. संचालक, सरकारी अभियोक्ता संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२८. सर्व पोलीस सह आयुक्त/उप आयुक्त (गुन्हे).
२९. सर्व सहायक संचालक व सरकारी अभियोक्ता.
३०. सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३१. अध्यक्ष, इंडियन नॅशनल कॉग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई.
३२. अध्यक्ष, राष्ट्रवादी कॉंग्रेस पक्ष, राष्ट्रवादी भवन, फ्रि प्रेस जर्नल मार्ग, नरिमन पॉईंट, मुंबई.
३३. अध्यक्ष, भारतीय जनता पक्ष, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ. बॅरेक नं.१, योगक्षेमम समोर, वसंतराव भगवान चौक, नरिमन पॉईंट, मुंबई.
३४. अध्यक्ष, भारतीय कम्युनिस्ट पक्ष, महाराष्ट्र कमिटी, ३१४ राजभवन, एस.व्ही, पटेल मार्ग, मुंबई.
३५. अध्यक्ष, राष्ट्रीय जनता दल (से), एल.आय.सी, इमारतीसमोर, मुंबई.
३६. अध्यक्ष, बहुजन समाज पक्ष, डी-१, इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई.
३७. अध्यक्ष, शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई.
३८. अध्यक्ष, महाराष्ट्र नवनिर्माण सेना, रायगड, २०२, मातोश्री टॉवर, दुसरा मजला, पद्माबाई ठक्कर मार्ग, माटुंगा(प), मुंबई.
३९. निवडनस्ती, विशा-२.